**प्रशासकीय मान्यता-**
सातारा येथे दिवाणी न्यायाधीश (व.स्त.)
यांच्याकरिता दोन निवासस्थाने बांधण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
विधी व न्याय विभाग,
**शासन निर्णय क्र.सीआरक्यू-३१०९/८७१/प्र.क्र.१४३/का.१३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक: १० फेब्रुवारी,२०११.

**पहा** :- -१) प्रबंधक(निरीक्षणे-२) उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यु)६०५३/ १९६५,दि.१२ नोव्हेंबर,२००९.
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, सातारा यांचे पत्र क्र.३८१३/२००९, दि.११.सप्टेंबर.२००९.

**शासन निर्णय** :-

सातारा येथे दिवाणी न्यायाधीश (व.स्त.) यांच्याकरिता दोन निवासस्थाने बांधण्यास येणाऱ्या रु. ३१,९५,२५५/-( रु.एकतीस लक्ष, पंच्याण्णव हजार दोनशे पंचावन्न फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

( रुपये )

| अ.क्र | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | इमारत बांधकाम किंमत | २५,९७,७६७ |
| २ | ४% आकस्मिकता खर्च | १,०३,९११ |
| ३ | ८% बाह्य पाणीपुरवठा आणि मलनिस्सारण | २,०७,८२२ |
| ४ | विद्युतीकरण (११%) | २,८५,७५५ |
| | एकूण-- | ३१,९५,२५५ |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.
(अ) " काम सुरु करण्यापूर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबत खातरजमा करण्यात यावी."
(ब) " मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मजूर करुन घेवूनच काम सुरु करावे."

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-७, ४२१६ गृहनिर्माणावरील भांडवली खर्च-०१ शासकीय निवासी इमारती-७०० इतर गृहनिर्माण (एक) न्यायदान,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतुद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-३४१/इमा-२, दि.२९.१२.२००९ अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र.:-विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम

पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( र. ग. पांचाळ )**
**कार्यासन अधिकारी.**

**प्रति,**

महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश,सातारा,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,सातारा
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग,सातारा,
जिल्हा कोषागार अधिकारी,सातारा
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
कार्यासन अधिकारी.(का.७,११ व १२),विधी व न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव,उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई- ४०० ०३२.
निवड नस्ती.